कनिष्ठ भूवैज्ञानिक ( गट-ब ) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना-२०१४/प्र.क्र.२००/पापु-१५

गो.ते.रुग्णालय संकुल, ७ वा माळा,

लो.टि.मार्ग, क्रॉफर्ड मार्केट, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

तारीख: २५ मार्च, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय ,पा. पु. व स्व. वि. क्र. आपना-४५०३/प्र.क्र.१०१/पापु-१५, दि.२७/९/२००५, दिनांक १२/१/२००६, दिनांक ४/४/२००६ व दिनांक ६/६/२००६.

२) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र. प्रशासन /आस्था-१/ परिविक्षा कालावधी/कभू/ ६००/२०१४, दिनांक १२ ऑगस्ट, २०१४ व ६२६,दिनांक २५ ऑगस्ट,२०१४

३) संचालक, भू. स. वि. यं., पुणे यांचे पत्र, क्र. प्रशासन /आस्था-२/गो.अ./प्र.क्र.०८/२०१३-१४/६८८/२०१४, दिनांक २४ सप्टेंबर,२०१४

४) संचालक, भू. स. वि. यं., पुणे यांचे पत्र क्र. प्रशासन /आस्था-२/परिविक्षा कालावधी/कभू/प्र.क्र./३८/२०१५,दिनांक १७ जानेवारी,२०१५

५) संचालक, भू. स. वि. यं., पुणे यांचे पत्र क्र. प्रशासन /कार्या-२ (अ)/गो.अ./ १०९/२०१५,दिनांक २० फेब्रुवारी,२०१५

प्रस्तावना :-

संचालनालय, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील विचाराधिन कनिष्ठ भूवैज्ञानिकांची कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) या पदावर संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद शासन निर्णयान्वये नामनिर्देशनाने दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरिता नेमणूक करण्यात आली होती.तथापि, संबंधित सर्व भूवैज्ञानिक विहित कालावधीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण झालेले नाहीत. त्यामुळे सदर आदेशातील परिच्छेद क्र. १ मध्ये असलेल्या तक्त्यातील अ.क्र.१ ते ३ येथील कनिष्ठ भूवैज्ञानिकांच्या सेवा दिनांक ४ मे,२०१२ च्या शासन निर्णयान्वये समाप्त करण्यात आल्या होत्या. त्यानुसार संबंधित कनिष्ठ भूवैज्ञानिकांनी दिनांक ४ मे,२०१२ च्या शासन निर्णयाविरुध्द दाखल केलेल्या याचिकेमध्ये मा.महाराष्ट्र प्रशासकीय

न्यायाधिकरणाने दिनांक १२/१०/२०१२ व दिनांक ३१/१०/२०१२ रोजी दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने विचाराधिन कनिष्ठ भूवैज्ञानिकांच्या सेवा दिनांक ९/१/२०१३ च्या शासननिर्णयान्वये पुनर्स्थापित करण्यात आल्या होत्या. त्यानुसार त्यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याची बाब विचाराधिन होती.

२. तसेच सदर आदेशातील परिच्छेद क्र. १ मध्ये असलेल्या तक्त्यातील अ.क्र. ४ येथील कनिष्ठ भूवैज्ञानिक श्री. राहूल ब्राह्मणकर हे दिनांक ४ मे, २०१२ चा शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वीच सहायक भूवैज्ञानिक या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त झाले होते. त्यामुळे त्यांची सेवा समाप्त करण्याची बाब उद्भवली नाही. तथापि, त्यांनी विशेष विभागीय परिक्षेस बसू देण्याबाबत मा. प्रशासकीय न्याधिकरण, मुंबई येथे दाखल केलेली याचिका क्र. ५७१/२०१३ व M.A. No. ४२४/२०१४ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दिनांक २५/०९/२०१४ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १० ऑक्टोबर, २०१४ च्या पूरक अधिसूचनेनुसार त्यांना विभागीय परिक्षेत उत्तीर्ण झाल्याचे घोषित केल्यानुसार त्यांचाही परिविक्षा कालावधी समाप्त करण्याची बाब विचाराधिन होती.

३. उक्त बाबी तसेच संदर्भाधिन क्र.२ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार आणि संदर्भाधिन क्र. ३, ४ व ५ च्या पत्रांन्वये प्राप्त झालेल्या माहितीनुसार सदर विचाराधिन कनिष्ठ भूवैज्ञानिकांचे कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) या पदावरील परिविक्षा कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन आदेश :-

उक्त प्रस्तावनेस अनुसरुन खालील तक्त्यात नमूद ४ कनिष्ठ भूवैज्ञानिकांचा कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) या पदाचा त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या परिविक्षा कालावधीतील कामाचा दर्जा योग्य त्या पात्रतेचा असल्याने त्यांचा परिविक्षा कालावधी खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या दिनांकापासून संपुष्टात आणण्यात येत असून त्यांच्या सेवा स्तंभ क्र. ५ मध्ये त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या दिनांकापासून पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | नाव | रूजु दिनांक | परिविक्षाधिन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | सेवा पुढे चालू ठेवण्याचा दिनांक | विहीत विभागीय परिक्षा उत्तीर्ण (वि.प.उ.) आहे काय किंवा अहवाल समाधानकारक आहे काय | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.आर.बी. शेटे | १९/१०/२००५ | ५/१२/२०१३ | ६/१२/२०१३ | परीक्षा २०१३ उत्तीर्ण ५/१२/२०१३ | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |

| अ.क्र. | नाव | रूजु दिनांक | परिविक्षाधिन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | सेवा पुढे चालू ठेवण्याचा दिनांक | विहीत विभागीय परिक्षा उत्तीर्ण (वि.प.उ.) आहे काय किंवा अहवाल समाधानकारक आहे काय | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | श्री. एस.बी. सरकाळे | २०/१०/२००५ | ५/१२/२०१३ | ६/१२/२०१३ | परीक्षा २०१३ उत्तीर्ण ५/१२/२०१३ | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |
| ३ | श्रीमती व्ही.आर. चौहान | २०/१०/२००५ | २/११/२०११ | ३/११/२०११ | परीक्षा २००८ उत्तीर्ण २/११/२०११ | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |
| ४ | श्री.आर.आर.ब्राम्हणकर | १९/१०/२००५ | १०/१०/२०१४ | ११/१०/२०१४ | परीक्षा २०१३ उत्तीर्ण १०/१०/२०१४ | परिविक्षा कालावधी समाधानकारक पूर्ण |

२. सदर शासन आदेशान्वये उक्त कनिष्ठ भूवैज्ञानिकांचे परिविक्षा कालावधी समाप्त करण्यात येत असले तरी त्यापैकी अ.क्र.३ येथे नमूद श्रीमती व्ही.आर. चौहान यांना वगळता इतरांना त्यांची दुसरी वेतनवाढ कधीपासून देय राहिल,याबाबत स्वतंत्ररित्या शासन आदेशान्वये कळविण्यात येणार आहे.

३. शासन आदेश क्र.आपना २६१३/प्र.क्र.१७१/पापु-१५,दिनांक १२ फेब्रुवारी, २०१५ अन्वये श्रीमती व्ही.आर. चौहान यांना त्यांची दुसरी वेतनवाढ कधीपासून देय राहिल तसेच सेवाबाह्य कालावधीतील वेतन व भत्ते याबाबतची थकबाकी देय करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२३१५५७३६९३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.03.25 15:14:12 +05'30'

**( प्रमोद कानडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोकण/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/

अमरावती /नागपूर विभाग

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई /नागपूर, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

४. संबंधित सर्व कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) (संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचेमार्फत)

५. निवडनस्ती (पापु-१५)